**महाराष्ट्र मालकी हक्काच्या सदनिकांबाबत (त्या बांधण्यास प्रोत्साहन देणे, त्यांची विक्री, व्यवस्थापन व हस्तांतरण यांचे नियमन करण्याबाबत) (सुधारणा) अधिनियम, २००८ (सन २००८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २३) च्या अंमलबजावणी संदर्भात प्रशासकीय आदेश.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः माहस-२००८/प्र.क्र.७०/दुवपु-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०१ मार्च, २०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः माहस-२००८/प्र.क्र.७०/दुवपु-२, दि. २० ऑगस्ट, २००८

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र मालकी हक्काच्या सदनिकांबाबत (MOFA)( त्या बांधण्यास प्रोत्साहन देणे, त्यांची विक्री, व्यवस्थापन व हस्तांतरण यांचे नियमन करण्याबाबत) अधिनियम, १९६३ मधील शासनाच्या कलम (२) (ढ) प्रवर्तकाने केवळ चटई क्षेत्रांनुसारच सदनिकेची विक्री करण्याची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदींच्या संदर्भात त्या विभागातील संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णयात नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य यांना, बाजार मूल्य दर तक्त्यामध्ये सदनिकांच्या चटई क्षेत्राच्या मुल्यांकनानुसार मुद्रांक शुल्काची रक्कम आकारण्याची तरतूद करण्यात यावी असे सुचित करण्यात आले होते. मुद्रांक शुल्काची आकारणी मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ च्या तरतुदीनुसार करण्यात येते व त्या विचारात घेता बांधिल मिळकतीच्याबाबतीत बिल्टअप क्षेत्रावर मुद्रांक शुल्क आकारणीची तरतूद आहे, ही बाब नोंदणी महानिरीक्षक मुद्रांक शुल्क यांनी या विभागाच्या निदर्शनास आणून दिली आहे. मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ मधील तरतुदी व संदर्भाधीन शासन निर्णयातील सूचना यांच्यामध्ये भिन्नता आढळून येते. शासन निर्णयातील सूचना ही अधिनियमातील तरतुदींना अधिक्रमित करु शकत नाही. शासन अधिनियम व शासन निर्णय यामधील शासन अधिनियमांचे असलेले श्रेष्ठत्व विचारात घेता संदर्भाधीन शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक-**

गृहनिर्माण विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ५ वगळण्यात यावा.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३०६१५१०४४९३०९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Meenal Dilip Pednekar

Digitally signed by Meenal Dilip Pednekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d3ff92ae3a8e5839988ca45db0eee3f448a9c88472103709dc1e857938d39c04, cn=Meenal Dilip Pednekar
Date: 2017.03.06 15:12:49 +05'30'

**( मीनल पेडणेकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई.(पत्राने)
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
३. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण विभाग) मंत्रालय, मुंबई-३२.
७. प्रधान सचिव (नगर विकास विभाग) मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग) महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व महानगरपालिका आयुक्त,
११. सर्व मुख्याधिकारी/नगरपरिषद,
१२. संचालक, नगर रचना, पुणे,
१३.संचालक, परिषद प्रशासन, मुंबई.
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय मुंबई-३२.
१७.महासंचालक, यशदा व राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
१८.निवड नस्ती (दुवपू-२). गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.